**राज्य शेतमाल भाव समितीचे राज्य कृषि मुल्य आयोगामध्ये रुपांतर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र. राकृमुआस्था-२०१४/प्र.क्र. ५९/शेमाभास-११अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : - २३ एप्रिल, २०१५

वाचा : शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेमाभास/२०१०/प्र.क्र.११९, दि. २९ मार्च २०१२

**प्रस्तावना :-**

**पीक उत्पादन खर्चाची आकडेवारी गोळा करण्याची योजना**- पीक उत्पादन खर्चाची आकडेवारी गोळा करण्यासाठी कायम स्वरुपी यंत्रणा कार्यरत असून, सदर योजना सन १९८० पासून राबविण्यात येत आहे. राज्यस्तरावर पीक उत्पादन खर्चाची आकडेवारी उपलब्ध व्हावी, तसेच शेतीमालास किफायतशीर भाव देण्यासाठी केंद्र शासनाकडे प्रस्ताव सादर करणे सोयीचे व्हावे या उद्येशाने सदरची योजना राबविण्यात येत आहे. राज्यातील महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि.अहमदनगर, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापिठ, परभणी, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापिठ, अकोला आणि डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापिठ, दापोली, जि.रत्नागिरी या चार कृषि विद्यापीठांच्या मदतीने सदर योजना राबविण्यात येत आहे.

**योजनेत समाविष्ट पिके** - सुरुवातीला धान, बाजरी , खरीप ज्वारी, रब्बी ज्वारी, गहु, कापूस, भुईमूग या ७ पिकांचाच उत्पादन खर्च काढण्याची कार्यवाही करण्यात येत असे. सद्य:स्थितीत धान, ज्वारी, बाजरी, मका, तूर, मूग, उडीद, भुईमूग, सोयाबीन, सुर्यफूल, तीळ, कापूस, खरीप कांदा, गहु, हरभरा, करडई, रब्बी ज्वारी व ऊस अशा एकूण १८ पिकांच्या उत्पादन खर्चावर आधारित प्रस्तावित किंमतीची शिफारस केंद्रिय कृषि मुल्य व किंमत आयोगाला करण्यात येते. केंद्रिय कृषि मुल्य व किंमत आयोग विविध राज्यातील संबंधित पिंकासाठी येणा-या उत्पादन खर्चाची आकडेवारी, तसेच केंद्र शासनाच्या बहुव्यापक योजनेअंतर्गत गोळा करण्यात आलेली पिक उत्पादन खर्चाची आकडेवारी व इतर घटक (जसे - मागणी आणि पुरवठा, आंतरराष्ट्रीय बाजारातील किंमतीची स्थिती, बाजारातील किंमतीमध्ये होणारे चढ-उतार, इत्यादी ) विचारात घेवून विविध पिकांच्या किमान आधारभूत किंमतीची शिफारस केंद्र शासनाकडे करते. त्या आधारे केंद्र शासन, राष्ट्रीय पातळीवर, किमान आधारभूत किंमत योजनेत समाविष्ट शेतमालाच्या आधारभूत किंमती निश्चित करुन जाहीर करीत असते. केंद्र शासनाने जाहीर केलेल्या किंमती सर्व राज्यांना लागू होतात. केंद्र शासन उक्त पिकांपैकी खरीप कांदा व रब्बी ज्वारी या पिकांसाठी किमान आधारभुत किंमत जाहीर करत नाही.

**राज्य शेतमाल भाव समिती रचना** - सदर योजना राबविण्यासाठी शासन स्तरावर मा. मंत्री (कृषि) यांच्या अध्यक्षतेखाली राज्य शेतमाल भाव समिती कार्यरत आहे. सदर समितीमध्ये मा. मंत्री (सहकार), मा. मंत्री (ग्राम विकास), मा. मंत्री (अन्न व नागरी पुरवठा), मा. राज्यमंत्री (कृषि), मा. राज्यमंत्री (सहकार), चारही कृषि विद्यापिठांचे कुलगुरु, अप्पर मुख्य सचिव /प्रधान सचिव (कृषि), हे सदस्य आहेत. राज्यातील शेतमालाला किफायतशीर भाव मिळावेत व ग्राहकांना वाजवी दरात शेतमाल खरेदी करता यावा या दुहेरी उद्येशाने दि. २९/३/२०१२ च्या शासन निर्णयान्वये “राज्य शेतमाल भाव समितीची” पुनर्रचना करण्यात आलेली आहे.

**<u>विचाराधिन प्रस्ताव:-</u>** राज्य शेतमाल भाव समितीच्या संरचनेत बदल करण्याची, तसेच समितीच्या कार्याच्या व्याप्तीत वाढ करण्याची, तसेच त्या अनुषंगाने राज्य शेतमाल भाव समितीचे रुपांतर राज्य कृषि मूल्य आयोगात करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-** राज्यातील शेतमालाला किफायतशीर भाव मिळावेत व ग्राहकांना वाजवी दरात शेतमाल खरेदी करता यावा या दुहेरी उद्येशाने राज्य शेतमाल भाव समितीचे पुनर्गठन करण्यासंदर्भातील दि. २९ मार्च २०१२ रोजीच्या शासन निर्णयाचे अधिक्रमण करुन प्रस्तुतच्या शासन निर्णयान्वे "राज्य शेतमाल भाव समितीचे" रुपांतर आता "राज्य कृषि मूल्य आयोगात" करण्यात येत आहे. नव्याने गठित होणा-या राज्य कृषि मूल्य आयोगाची संरचना व कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.

**अ) <u>राज्य कृषि मूल्य आयोग (संरचना) :</u>**

| | | |
|---|---|---|
| १) | कृषि क्षेत्रातील तज्ञ व्यक्ती तथा कृषि मूल्य/ शेतमाल भाव यासंबंधी जाणकार असणारी शासन नियुक्त व्यक्ती | अध्यक्ष |
| २) | कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, ता. राहुरी, जि.अहमदनगर | सदस्य |
| ३) | कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी | सदस्य |
| ४) | कुलगुरु, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला | सदस्य |
| ५) | कुलगुरु, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, ता. दापोली, जिल्हा- रत्नागिरी | सदस्य |
| ६) | अपर मुख्य सचिव (कृषि) | सदस्य |
| ७) | कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे | सदस्य |
| ८) | विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, ता. राहुरी, जि.अहमदनगर | सदस्य |
| ९) | विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी | सदस्य |
| १०) | विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला | सदस्य |
| ११) | विभाग प्रमुख, कृषि अर्थशास्त्र विभाग, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, ता. दापोली, जि. रत्नागिरी | सदस्य |
| १२) | निमंत्रित लोक प्रतिनिधी | सदस्य |
| १३) | निमंत्रित शेतकरी प्रतिनिधी | सदस्य |
| १४) | सह संचालक, राज्य कृषि मुल्य आयोग कक्ष, मंत्रालय, मुंबई. | सदस्य सचिव |

**ब) राज्य कृषि मूल्य आयोगाची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.**

१) प्रमुख शेती पिकांच्या उत्पादन खर्चाचा वास्तववादी अंदाज काढून त्या संदर्भात राज्य शासनाला शिफारशी पाठविणे.

२) पीक उत्पादन खर्चाचा वास्तववादी अंदाज काढण्याकरिता प्रमाणित संकल्पना, शास्त्रशुध्द पध्दती व भौगोलिक परिस्थितीचा अवलंब करणे त्याचप्रमाणे विचारात घेणे.

३) खुल्या बाजारातील प्रमुख शेतमालाच्या भावातील चढउताराचा अभ्यास करुन राज्य शासनाला सुध्दा बाजारात हस्तक्षेप करण्यासंदर्भात वेळोवेळी सल्ला देणे.

४) उत्पादन, शेतीपिकाखालील क्षेत्र, उत्पादकता यांचे विश्लेषण करुन भविष्यातील मागणी, पुरवठा व किंमती यांचा अंदाज बांधणे त्या अनुषंगाने राज्य शासनाला कृषि धोरण ठरविण्यासंदर्भात सल्ला देणे.

५) पेरणी हंगामापुर्वी किमान दोन महिने अगोदर केंद्र शासनाला वाजवी व किफायतशीर हमी भाव किंमतीसाठी शिफारशी करणे अशा शिफारशी करताना शेतकरी उत्पादक व उपभोक्ता ग्राहक या दोघांच्या हिताचा समतोल साधणे.

६) शेतमालाचे उत्पादन, विपणन, व्यापार, किंमती, खरेदी-विक्री, संशोधन इ. संदर्भात विश्वसनीय व गुणवत्तापुर्ण माहिती तयार करुन त्याचे विश्लेषण करणे.

७) भावपातळीतील चढउतार, विपणन, विपणनातील धोके इ. संदर्भात तज्ञ व्यक्ती, संशोधक, अर्थशास्त्रज्ञ यांच्या मदतीने वर्कशॉप घेणे, मेळाव्यांचे आयोजन करणे, अहवाल प्रसिद्ध करणे, माहिती पुस्तकांच्या माध्यमातून शेतक-यांना सल्ला देणे, इ. कार्यक्रम राबविणे.

८) समुहशेती, संघपध्दतीतील विपणन इ. माध्यमातून दलालांचा हस्तक्षेप संपविणे/कमी करण्यासंदर्भात उपाययोजना सुचविणे. शेतक-यांना शेती करणे किफायतशीर ठरण्याकरिता सामुहिक शेतीला प्रोत्साहन देण्यासाठी उपाययोजना सुचविणे.

९) संघाच्या माध्यमातून विपणन व्यवस्था बळकट करणे जेणेकरून दलालांचा हस्तक्षेप कमी राहून शेतक-याला शेतमालाचे किफायतशीर भाव मिळणे शक्य होईल.

१०) संघाच्या माध्यमातून शेतमाल निर्यात करण्यास प्रोत्साहन देण्याकरिता उपाययोजना सुचविणे. आवश्यकतेनुसार केंद्र शासनाने घातलेली निर्यातबंदी ठरविण्याबाबत करावयाच्या उपाययोजनेबाबत शासनास सल्ला देणे.

११) संघाच्या माध्यमातून शेतमालाच्या साठवणूकीसाठी गोदामे उभारणे, गोदाम पावतीच्या आधारे शेतक-यांना खर्चासाठी आगाऊ स्वरुपात रकमा / कर्ज उपलब्ध करून देणे, इ. संदर्भात राज्य शासनाला उपाययोजना सुचविणे.

१२) शेतमालावरील अन्न प्रक्रिया उद्योग सूरू करण्यासंदर्भात त्या अनुषंगाने द्यावयाच्या अनुदानासंदर्भात राज्य शासनाला सल्ला देणे.

१३) शेतमालाच्या उत्पादनासंदर्भात उत्पादक ते ग्राहक अशी दलालरहित थेट साखळीव्यवस्था उभारण्या संदर्भात राज्य शासनाला सल्ला देणे.

१४) शेतमालाचे उत्पादन, विपणन, किंमती, इ. संदर्भात Agricultural Portal (कृषि विषयक ज्ञानाचे/ माहितीचे महाजाल स्थळ) तयार करणे, त्याप्रमाणे तांत्रिक कक्ष उघडणे, नियमितपणे माहिती अद्यावत करून शेतक-यांना मोफत उपलब्ध करून देण्याकरिता शासनाला सल्ला देणे.

१५) हवामान आधारित कृषि विभागानुसार शेतमालाच्या उत्पादनासंदर्भात योजना तयार करून त्यांचे महत्व शेतक-यांना पटवून तो योग्यरितीने राबविण्याबाबत कार्यक्रम तयार करणे.

१६) राज्य शासन आणि केंद्रिय कृषि मूल्य आयोग यांच्यामध्ये समन्वय ठेवणे.

१७) यासंदर्भात केंद्र शासनाने जाहिर केलेल्या किंमती राज्य शासनाने शिफारस केलेल्या किंमतीपेक्षा कमी असल्यास अशा परिस्थितीत राज्य शासनाने केलेली शिफारस वास्तवदर्शी असल्याने सदर शिफारशीनुसार येणारी फरकाची रक्कम देण्यात यावी किंवा कसे याबाबत शासनाला शिफारस करणे.

१८) आयुक्त (कृषि) यांच्या अध्यक्षतेखाली गठीत कार्यकारी उपसमितीने सादर केलेल्या अहवालातील शिफारशींची अमंलबजावणी करण्यासंदर्भात शासनाला उचित सल्ला देणे.

**क)** राज्य शेतमाल भाव समितीचे रुपांतर, राज्य कृषि मूल्य आयोगात केल्यामूळे मंत्रालयातील कृषि विभागाच्या आस्थापनेवरील कार्यरत असलेल्या राज्य शेतमाल भाव समिती कक्षाचे नामांतर राज्य कृषि मूल्य आयोग कक्ष असे करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०४२३१४११२२७००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने

Sudhir Kumar Goel

Digitally signed by Sudhir Kumar Goel
DN: c=IN, o=All India Service, ou=IAS, postalCode=110001, st=Maharashtra, cn=Sudhir Kumar Goel
Date: 2015.04.24 13:07:44 +05'30'

**(डॉ. सुधीरकुमार गोयल)**
अप्पर मुख्य सचिव (कृषि व पणन)
महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.मंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई
४) मा.मंत्री (वित्त), मंत्रालय, मुंबई
५) मा.मंत्री (सहकार व पणन), मंत्रालय, मुंबई
६) मा. मंत्री (अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण ), मंत्रालय, मुंबई
७) मा. मंत्री (सर्व)
८) मा.राज्यमंत्री (सर्व)
९) मा.राज्यमंत्री (कृषि), मंत्रालय, मुंबई
१०) मा. विरोधी पक्ष नेता विधान सभा/विधान परिषद
११) मा. विधान सभा/विधान परिषद सदस्य (सर्व)
१२) राजकीय पक्षाची कार्यालय (सर्व)
१३) कुलगुरु, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि.अहमदनगर
१४) कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
१५) कुलगुरु, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला

१६) कुलगुरु, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी
१७) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांचे अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
१८) अप्पर मुख्य सचिव (कृषि / पणन) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) अप्पर मुख्य सचिव (वित्त) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) अप्पर मुख्य सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२१) प्रधान सचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
२२) सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
२३) आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे
२४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
२५) उपसचिव (निविष्ठा व गुणनियंत्रण) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२६) विभाग प्रमुख (कृषि अर्थशास्त्र), महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी, जि.अहमदनगर
२७) विभाग प्रमुख (कृषि अर्थशास्त्र), वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी
२८) विभाग प्रमुख (कृषि अर्थशास्त्र), डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ, अकोला
२९) विभाग प्रमुख (कृषि अर्थशास्त्र), डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी
३०) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
३१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
३२) कृषि व पदुम विभागातील उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी (सर्व)
३३) कृषि संचालक (सर्व), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
३४) विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
३५) जिल्हाअधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
३६) अवर सचिव कार्यासन ११-अे
३७) सहसंचालक, राज्य कृषि मुल्य आयोग कक्ष, सर एच.सी. दिनशॉ बिल्डींग. फोर्ट, मुंबई
३८) ग्रथांलय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई
३९) निवड नस्ती, ११-अे